# कडेगावची भानामती आणि अंधश्रद्धानिर्मूलन समितीची बुवाबाजी

## प्रकरण १




कराडच्या पूर्वेस २० किलोमीटर अंतरावर असलेल्या कडेगाव (ता. खानापूर, जि. सांगली) या गावी भानामतीचा एक विलक्षण प्रकार सुरू झाला असल्याची बातमी १५ मार्च १९८८ च्या दै. पुढारीमध्ये प्रसिद्ध झाली. या गावातील मराठी शाळेतील इयत्ता तिसरीत शिकत असलेल्या मुलींच्या डोळ्यातून आपोआप खड़े निघत असल्याचे व नेत्रतज्ज्ञ व इतर अधिकारी व्यक्तींनी हा प्रकार प्रत्यक्ष तेथे जाऊन पाहून खरा असल्याची खात्री करून घेतल्याचे व त्यांना हा प्रकार मती गुंग करणारा वाटला असल्याचे पुढे त्या बातमीत म्हटले होते. या संबंधीची खरी परिस्थिती समजावून घेण्यासाठी मी ही घटना घडून गेल्यानंतर, म्हणजे हा प्रकार पूर्ण थांबल्यानंतर व या प्रकाराने उठलेले वादळ शमल्यानंतर - १८ एप्रिल

रोजी तेथे गेलो व संबंधितांच्या मुलाखती घेऊन सत्य परिस्थितीचा - शोध घेतला. मला आढळून आलेली पुढील माहिती संबंधितांच्या मुलाखतीवर आधारलेली आहे.

## सुरुवात कोठे झाली?

कु. तनुजा मानसिंग माने (वय ८) या तिसरीत शिकत असलेल्या मुलीच्या डोळ्यातून दि. १७ फेब्रुवारी १९८८ रोजी प्रथम ती शाळेत असताना खडे येण्यास सुरुवात झाली. ही मुलगी सांगाव, ता. कागल जि. कोल्हापूर येथे राहणारी असून तिचे वडील वारल्यामुळे तिच्या आजोबांनी (आईच्या वडिलांनी ) तिला कडेगाव येथे आपल्याकडे पालनपोषणासाठी ठेवून घेतले आहे. तिच्या डोळ्यातून खडे येण्याचा प्रकार प्रथम शाळेत सुरू झाला असला, तरी नंतर घरीसुद्धा तशाच प्रकारे तिच्या डोळ्यातून खडे येऊ लागले. या प्रकाराची तो एका मुलीपुरता मर्यादित राहिल्याने गावात फारशी वाच्यता झाली नाही. काही दिवस हा प्रकार चालू राहिल्यानंतर तिच्या आजोळच्या लोकांना हा प्रकार सांगावकडील -म्हणजे तेथील भानामतीमुळे झालेला असावा असे वाटून तिला त्यांनी परंपरागत उपचारासाठी सांगावला पाठविले. सांगावला ती मुलगी दोन आठवडे राहिली, पण तेथेही हा प्रकार चालूच राहिला. म्हणून दोन आठवड्यांनी परत कडेगावला आणण्यात आले. कडेगावला आल्यानंतरही खडे येण्याचा प्रकार थांबला नाही. इतकेच नव्हे, तर मार्चच्या पहिल्या आठवड्यात त्याच वर्गातील इतरही मुलींच्या डोळ्यातून अशाच प्रकारे खडे येण्यास सुरुवात झाली. आश्चर्य म्हणजे तनुजाप्रमाणेच इतर सर्व मुलींच्या बाबतीतही डोळ्यातून खडे येण्याचा प्रकार त्या मुली शाळेत असतानाच सुरू झाला. या मुलींमध्ये जिल्हा परिषदेचे एक सदस्य, माजी सरपंच व कडेगावचे व्यापारी श्री. पांडुरंग गोविंद डांगे यांच्या मुलीचाही समावेश होत होता. अशा प्रकारे खडे येण्याचा प्रकार तिसरीमधील नऊ व पहिलीमधील एक अशा एकूण दहा मुलींच्या बाबतीत घडत होता. या प्रकारामुळे गावात मोठीच खळबळ माजली. हा प्रकार ज्या शाळेत घडत होता, त्या शाळेच्या शेजारीच डॉ. एस्. एम्. बर्वे यांचा दवाखाना असल्याने स्वाभाविकच त्यांचे प्रथम या प्रकाराकडे लक्ष वेधले. त्यांनी या प्रकाराची स्वतः तपासणी केली, खडेही तपासले व त्या प्रकाराच्या खरेपणाची खात्री पटल्यानंतर तेही आश्चर्यचकित झाले. थोड्याच अवधीत ही बातमी पसरली व वैद्यकीय क्षेत्रातली तज्ज्ञ मंडळी मुद्दाम कडेगावाला येऊन हा प्रकार पाहून जाऊ लागली. या तज्ज्ञांमध्ये सांगली जिल्हा आरोग्य अधिकारी, सिव्हिल सर्जन डॉ. पानसे, सांगली जिल्हा परिषदेचे मुख्य नेत्रतज्ज्ञ डॉ. श्रीमती लागू, मिरज मेडिकल कॉलेजमधील नेत्रविभागाचे प्रमुख डॉ. आयाचित हे प्रमुख होते. या सर्व तज्ज्ञांनी हा प्रकार वैद्यकीय क्षेत्राबाहेरचा नॉन

मेडिकल असल्याचा, म्हणजे डोळ्यातून खडे येण्याचे वैद्यकीय किंवा शरीरशास्त्राच्या दृष्टीने काहीच कारण नसल्याचा आपला अभिप्राय व्यक्त केला. ज्या तनुजा नावाच्या मुलीच्या डोळ्यातून खडे येण्यास प्रथम सुरुवात झाली, त्या मुलीचे आजोबा हे निवृत्त मराठी शाळेचे मुख्याध्यापक असून त्यांनी कराड येथील एका नेत्रतज्ज्ञाकडे (डॉ. भेदा) मुलीला नेले व तपासणी करवली. त्यांनीही वरीलप्रमाणेच मत दिले. त्या मुलीच्या डोळ्याचा एक्सरेही काढण्यात आला. पण त्यात काही आढळून आले नाही. १२ मार्च १९८८ रोजी गावातील प्रतिष्ठित नागरिक, पालक, फौजदार, प्राथमिक आरोग्य केंद्रातील डॉक्टर, शिक्षण खात्याचे वरिष्ठ अधिकारी शाळेत जमले व या प्रकाराचे प्रत्यक्ष निरीक्षण करून हा प्रकार खरा असल्याची, यात काही फसवेगिरी नसल्याची स्वतच्री खात्री करून घेतली.

## अंधश्रद्धा निर्मूलन समितीची मुलीवरील दमबाजी

दरम्यान डॉ. बर्वे यांनी अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या लोकांना या बातमीची खबर देऊन कडेगावला बोलावून घेतले. साताऱ्याचे डॉ. दाभोळकर व इतर काही लोक १५ मार्च रोजी कडेगावला आले व त्यांनी डॉ. बर्वे यांच्या दवाखान्यातील एका खोलीन एक-दोन मुलींना बोलावून घेऊन त्यांची 'तपासणी' करण्यास सुरुवात केली. ही 'तपासणी करीत असताना त्यांनी खोलीचा दरवाजा बंद करून घेतला व कोणालाच आत येऊ दिले नाही. मात्र डॉ. बर्वे यांनी आपली औषधे त्या खोलीत असल्याचे व ती वेळ पेशंट्ट येण्याची असल्याचे सांगितल्यावरून त्यांनी डॉ. बर्वेंना फक्त आत येण्यास परवानगी दिली. अशा रीतीने डॉ. बर्वे अधूनमधून खोलीत जाऊन येत असल्यामुळे त्यांना त्यांच्या तपासणीची पद्धत माहीत झाली. नंतर मुलींनीही सर्व काही सांगितले.

डॉ. बर्वे यांनी सांगितले, की डॉ. दाभोळकरांनी या मुलींना आंजारून गोंजारून त्यांच्याकडून आपणच डोळ्यात खडे घालून घेतो व नंतर काढून दाखवतो असे कबूल करून घेण्याचा बराच प्रयत्न केला. पण मुलींनी हे मान्य केले नाही. व खडे आपोआप येतात असे म्हटले, तेव्हा त्यांनी, आपण डोळ्यात खडे घालतो व नंतर काढून दाखवतो असे एका मुलीने कबूल केल्याचे खोटेच सांगून "तुम्हीही तसेच करीत असल्याचे कबूल करा, नाहीतर तुम्हाला पोलिसांच्या ताब्यात देऊ, साताऱ्याला नेऊ, डोळे काढू." इत्यादी शब्दात धाकदपटशा दाखवून व दम देऊन त्यांच्याकडून आपणच डोळ्यात खडे घालतो असे कबूल करून घेतले, तसे लिहूनही घेतले व त्यांचे फोटोही घेतले. नंतर गावातील लोकांची सभा बोलावून हा प्रकार भानामतीचा नसून

मुली आपण होऊन स्वतःच्या डोळ्यात खड़े घालून घेतात व नंतर काढून दाखवतात व एका मुलीने हा प्रकार केल्याचे पाहून तिच्या संगतीने इतर मुलीही असाच प्रकार करायला शिकल्या, असा या लोकांनी खुलासा केला. पण ग्रामस्थांचे या खुलाशाने मुळीच समाधान झाले नाही. काही नागरिक, विशेषतःपालक, विज्ञान प्रबोधिनीच्या कार्यकर्त्यांच्या या खुलाशाने खूप चिडले. जिल्हा परिषदेचे सदस्य श्री. डांगे यांच्या मुलीच्याही डोळ्यातून खडे येत असल्याने व त्यांना या प्रकाराची पूर्ण कल्पना असल्यामुळे ते या खुलाशाने विशेष चिडले. पण आपण या लोकांना मुद्दाम कडेगावला बोलावून घेतले असल्याने त्यांचा येथे अपमान करू नये, नाहीतर गावाची अब्रू जाईल असा विचार करणाऱ्या काही सूज्ञ मंडळींनी त्यांची व इतरांची समजूत घातल्यामुळे त्यांनी आपला राग आवरला; व सभा कशीबशी संपली.

या सभेनंतर समितीच्या लोकांनी अत्यंत घाईने दै. पुढारीला हा प्रकार भानामतीचा नसल्याचा व आपण त्याचे गूढ उकलल्याचा दावा करणारा सविस्तर खुलासा पाठविला. तो दुसऱ्याच दिवशी १६ मार्चच्या अंकात प्रसिद्ध झाला. हा खुलासा वाचून कडेगावचे गुलाबराव देशमुख, डॉ. अशोक काळे, व दत्तात्रय कुलकर्णी (मुख्याध्यापक, मुलींची शाळा) या तिघांनी दै. पुढारीला खालील पत्र लिहिले व ते संपादकांनी २३ मार्चच्या अंकात प्रसिद्ध केले. हे नागरिक आपल्या पत्रात म्हणतात :

## वस्तुस्थिती नेमकी काय?

१६ मार्चच्या 'पुढारी'त कडेगावच्या प्रकरणाबाबत अंधश्रद्धा निर्मूलन समितीचा खुलासा छापला आहे. त्याबाबतची वस्तुस्थिती अशी आहे, की अंधश्रद्धा निर्मूलन समिती व विज्ञान प्रबोधिनीचे लोक कडेगावात आले. त्यांनी प्रत्येक मुलीला बंद खोलीत घेऊन प्रश्नांचा भडिमार केला. त्यांच्याकडून बळजबरीने लिहून घेऊन फोटोही काढण्यात आले.

१ ली २ री मध्ये शिकणाऱ्या मुली फार लहान असून त्या मुद्दाम डोळ्यात खडे घालून कशासाठी घेतील? त्या जर तशा करीत असतील तर समितीच्या लोकांनी स्वतः च्या डोळ्यात खडे घालून घेऊन तो प्रयोग करून गावकऱ्यांपुढे का दाखवला नाही?

मुलींची तपासणी बंद खोलीत करीत असताना पत्रकारांना किंवा मुलींच्या पालकांना वा संबंधित शिक्षकांना आत प्रवेश देण्यात आला नव्हता. मुलींच्या सांगण्यावरून (असे दिसते की) मुलींवर जबरदस्ती करण्यात आली. ग्रामसभेत

मुलींनी डोळयात खडे घालून ते काढून दाखवण्याचा प्रकार झालेला 'नाही, आणि अद्यापि डोळ्यातून खडे येणे बंद झालेले नाही.

गुलाबराव देशमुख, डॉ. अशोक काळे, दत्तात्रय कुलकर्णी (मुख्याध्यापक, मुलींची शाळा) कडेगाव.

## दाभोळकरांनी दिलेले खोटे आश्वासन

डॉ. काळे प्रभृतींनी लिहिलेले हे पत्र म्हणजे केवळ त्या पत्रलेखकांचीच प्रतिक्रिया नसून सबंध कडेगावच्या ग्रामस्थांची व विशेषत: पालकांची प्रतिक्रिया आहे. स्वतला विज्ञान प्रबोधिनीचा कार्यकर्ता म्हणवून घेणाऱ्या डॉ. दाभोळकरांना वैज्ञानिक पद्धतीने या प्रकरणातील सत्य शोधता यावे म्हणून कडेगावला मुद्दाम ज्यांनी बोलावून घेतले ते डॉ. बर्वेसुद्धा वरील पत्रातील विचाराशी सहमत असल्याचे मला आढळून आले. डॉ. बर्वे म्हणाले की, दाभोळकरांचा या विषयीचा दृष्टिकोन पूर्वग्रहदूषित असून भानामती वगैरे सर्व खोटे असल्याचे अगोदरच गृहीत धरून ते सिद्ध कसे करता येईल हेच पाहण्याचा त्यांचा प्रयत्न दिसला. मात्र आपणाला त्यांची एक गोष्ट आवडली असे ते म्हणाले. ती म्हणजे त्यांनी छातीवर हात ठेवून असे आश्वासन दिले की आता येथून पुढे मुलींच्या डोळ्यातून खडे येणार नाहीत, कारण आम्ही त्यांना चांगलाच धाक घातला आहे. आणि काही दिवसांनी जर पुन्हा डोळ्यातून खडे येऊ लागलेच तर आम्ही त्या मुलींना व त्यांच्या पालकांना स्वतच्या खर्चाने साताऱ्याला घेऊन जाऊ; त्यांची तेथे स्वतच्या खचाने राहण्याची सोय करू व हा प्रकार बंद झाल्यावरच पाठवून देऊ. पण हा प्रकार बंद झालाच नाही, तसाच पूर्ववत राहिला. आणि दाभोळकरांनी याची त्यानंतर कधीच वास्तुपुस्त केली नाही. स्वखर्चाने नेणे बाजूलाच राहिले. अगोदरच त्यांच्यावर चिडलेल्या गावकऱ्यांना ही समितीच्या लोकांची बुवाबाजी वाटली यात नवल नाही.

येथे एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. दाभोळकर किंवा अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे इतर कार्यकर्ते यांची भानामती खोटी आहे हे सिद्ध करण्यासाठी संबंधित व्यक्तीला एकटीलाच बंद खोलीत घेऊन सामोपचाराने ते शक्य न झाल्यास धाकदपटशा दाखवून, आपणास पाहिजे तसे तिच्याकडून वदवून घेण्याची पद्धत त्यांनी त्यांचे बौद्धिक गुरु श्रीलंकेचे अब्राहम कोवूर यांच्याकडून उचलली आहे. ही गोष्ट कोवरांनी लिहिलेली Gods, Demons and Spirits आणि Begone Godmen ! ही दोन पुस्तके वाचल्यानंतर कोणाच्याही लक्षात येईल ! कारण यातील Poltergiest या प्रकरणात त्यांनी नेमके याच पद्धतीचा अवलंब करून "भानामती खोटी !" असे

जाहीर केले आहे. मात्र वाचकांना आपले लिखाण वास्तव वाटावे म्हणून त्यात त्यांनी बराच मालमसाला घातला आहे ! गावकऱ्यांचा मुख्य प्रश्न मुलींच्या डोळ्यातून खडे भानामतीमुळे येत नसून त्या मुलींनी ते मुद्दाम डोळ्यात घालून घेतल्यामुळे येतात, या अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या खुलाशावर गावकऱ्यांचा मुख्य प्रश्न असा होता, की इतक्या लहान वयाच्या मुली - सर्वांची वये ५ ते ९ पर्यंत आहेत मुद्दाम आपल्या डोळ्यात कशासाठी खडे घालून - घेतील? यावर समितीच्या लोकांचे उत्तर असे की, भांडी धुणे, घरकाम इ. टळावे म्हणून ! त्यांचे हे उत्तर बरोबर आहे असे क्षणभर समजू. आता हे घरकाम टळावे म्हणून या मुलींनी त्या घरात असताना हे खडे घालून घ्यावयास नको काय? पण प्रत्यक्षात सर्वच मुलींच्या डोळ्यातून प्रथम खड़े येण्यास सुरुवात झाली ती शाळेत ! घरातील काम टळावे म्हणून कुणी शाळेत डोळ्यात खडे घालून घेईल काय ?

दुसरी गोष्ट, डोळ्यात खडे घालून घेणे ही सहजसाध्य गोष्ट आहे काय, की जी पाचसहा वर्षांची मुली स्वेच्छेने करील? एका मुलीला डोळ्यात जबरदस्तीने खडे घालून घेण्यास भाग पाडण्यात आले, तेव्हा तिच्या डोळ्यांतून पाणी आल्याचे आढळून आले आहे. (आणि हा प्रयोग कोणीही करून पाहू शकतो, मात्र हा प्रयोग गावकऱ्यांच्या सभेत झालेला नाही.) म्हणजे डोळ्यात खडे घालून घेणे ही सहजसुलभ गोष्ट नसून अत्यंत त्रासाची आहे. (डोळ्यातून खडे येण्याच्या नेहमीच्या प्रकासत मात्र डोळ्यातून असे पाणी आल्याचे कधीच आढळून आलेले नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.)

तिसरी गोष्ट, 'पुढारी'तील पत्रलेखकांनी विचारल्याप्रमाणे हा डोळ्यात खडे घालून घेण्याचा प्रयोग समितीच्या लोकांनी गावकऱ्यांच्या समेत स्वतःका करून दाखवला नाही? तनुजा या मुलीचे आजोबा व निवृत्त मुख्याध्यापक श्री. देशमुख यांनी सांगितले की त्यांच्या नातीच्या डोळ्यातून ३०० खडे बाहेर आले आहेत. या लोकांनी निदान ३ खडे तरी डोळ्यात घालून बाहेर काढून दाखवायचे होते !

चौथी गोष्ट, डोळ्यातून खडे येण्याचा प्रकार एकदोन नव्हे, दहा मुलींच्या बाबतीत घडत होता, आणि तोही दिवसातून एकदोनदा नव्हे अनेकवेळा. (कधीकधी ५-१० मिनिटांनी खडे येत.) आणि तेही एक-दोन दिवस नव्हे १०-१५ दिवस. (तनुजाच्या बाबतीत तर एक महिना हा प्रकार चालू होता.) आता प्रश्न असा आहे, की इतक्या मुली दररोज इतक्या वेळा, इतके दिवस डोळ्यात खडे घालून घेत होत्या, तर एकही मुलगी, एकदाही कुणाला आपल्या डोळ्यात खडे घालून घेताना कशी सापडली नाही?

## विज्ञान प्रबोधिनीच्या कार्यकर्त्यांचे अवैज्ञानिक संशोधन

सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्वतला विज्ञान प्रबोधिनीचे कार्यकर्ते म्हणवून घेणाऱ्या या लोकांनी या घटनेचे वैज्ञानिक पद्धतीने संशोधन केले आहे काय? घरकाम चुकविण्यासाठी नेहमीचे उपाय माहीत असताना हा मुलखावेगळा डोळ्यात खडे घालून घेण्याचा उपाय एखाद्या ८-९ वर्षाच्या मुलीला सुचण्याचा कितपत संभव आहे? हाच उपाय तिला का सुचला ? हा प्रश्न त्यांनी स्वतला विचारला आहे काय? पण हा प्रश्न तूर्त बाजूस ठेवू व तो सुचला हे गृहीत धरू. आता घरकाम चुकविण्यासाठी प्रथम ज्या मुलीने हा प्रकार सुरू केला असे हे कार्यकते म्हणतात, त्या तनुजा मानसिंग माने या तिसरीतील मुलीच्या बाबतीत त्यांनी हा निष्कर्ष तिच्या घरच्या परिस्थतीचा संपूर्ण अभ्यास करून मगच काढला आहे काय? तसेच ज्या इतर नऊ मुलींनी तनुजाचे 'अनुकरण केले', असे ते म्हणतात ) त्यांच्याही घरच्या परिस्थितीचा अभ्यास करून त्यांनाही अशाच प्रकारे घरकाम सांगण्यात येत असल्याची खात्री करून मगच तो निष्कर्ष काढला आहे काय? एवढ्यावरून त्यांचा घरकाम चुकविण्याविषयीचा हा सिद्धांत खरा ठरत नाही, तर ज्या मुलींच्या बाबतीत डोळ्यातून खडे येण्याचा हा प्रकार घडत नव्हता, त्यांना त्यांच्या घरी घरकाम सांगितले जात नव्हते, याचीही खात्री करून घ्यायला पाहिजे. आणि समजा घरकाम असूनही त्या जर डोळ्यात खडे घालून घेण्याचा प्रकार करीत नसतील, तर त्या तसे का करीत नव्हत्या याचे समर्पक कारण शोधून दिले पाहिजे. पण यापैकी या लोकांनी एकही गोष्ट न करता स्वतला साक्षात्कार झाल्याप्रमाणे "डोळ्यातून खडे येण्याच्या प्रकाराचे गूढ उकलले" या मथळ्याच्या पुढारीला पाठवलेल्या आपल्या पत्रकात आपला घरकाम चुकविण्याविषयीचा सिद्धांत ठोकून दिला आहे. यालाच वैज्ञानिक संशोधन म्हणतात काय? असेच विज्ञानाचे कार्य करायचे असते काय? समितीची पोकळ कारणे

ज्या तनुजा या मुलीच्या डोळ्यातून प्रथम खडे येण्यास सुरुवात झाली, त्या मुलीचे आजोबा व निवृत्त मुख्याध्यापक श्री. सर्जेराव देशमुख म्हणाले की, "घरकाम व मारहाण टाळण्यासाठी आपल्या नातीने हा प्रकार सुरू केला असे समितीचे लोक म्हणतात. पण वस्तुतःआम्ही तनुजाला तिचे वडील वारल्यामुळे पालपोषणासाठी व शिक्षणासाठी आजोळी आणले आहे. अशा परिस्थितीत आम्ही तिला मारू काय? कशासाठी मारू ? मारणे तर राहोच, आम्ही तिला साधे कामही सांगत नाही." आता हे ६८ वर्षे वयाचे निवृत्त मुख्याध्यापक खोटे कशासाठी बोलतील? बरे, तिला ते घरकाम सांगत होते असे क्षणभर समजले, तरी ज्या उद्देशाने ती मुलगी डोळ्यात खडे घालून

घेत होती तो हेतू खडे घालून घेतल्यामुळे साध्य झाला काय? हा प्रश्न आहे. झाला असे म्हणायचे असेल, तर मग तो हेतु साध्य झाल्यानंतर थोड्याच दिवसात तिने तो प्रकार बंद करावयास पाहिजे होता. पण तसा तो बंद झालेला नाही. बरे, तो साध्य झाला नाही असे म्हणायचे असेल, तरी खडे घालून काही उपयोग नाही म्हणूनही तो प्रकार तिने बंद करावयास पाहिजे होता. दोन्ही दृष्टींनी पाहिले तरी हा डोळ्यात खडे घालून घेण्याचा प्रकार फार दिवस चालण्याचे काहीच कारण नाही. पण हा प्रकार तब्बल एक महिना चालू होता. विशेष म्हणजे त्या मुलीला सांगाव या तिच्या गावी पाठविल्यानंतरही चालू होता. आता तिच्या गावी तिची आईसुद्धा तिला मारहाण करीत होती व कामे सांगत होती असे हे लोक म्हणणार आहेत काय?

दुसरी गोष्ट अशी, की कामे चुकविण्यासाठी ही मुलगी डोळ्यात खडे घालून घेत होती असे समजले तर, डोळ्यात खडे घालून घेणे ही गोष्ट किती त्रासाची आहे हे लक्षात घेता असे म्हणावे लागते की त्या मुलीला इतकी त्रासाची अप्रिय कामे सांगण्यात येत होती, की ती कामे करण्यापेक्षा डोळ्यात खड़े घालून घेणे तिला सुखाचे वाटत होते. तेव्हा इतकी कोणती अप्रिय कामे तिला सांगण्यात येत होती हे सांगण्याची समितीच्या लोकांची जबाबदारी आहे आणि ही जबाबदारी तनुजापुरती नसून सर्वच मुलींच्या बाबतीत आहे.

तिसरी गोष्ट अशी, की घरकाम चुकविण्यासाठी या मुली हा प्रकार करीत असतील तर तिसरीतील मुलींनीच हा प्रकार का केला? कारण प्रथम हा प्रकार करणारी तनुजा ही मुलगी तिसरीत असून तिच्या संगतीने त्या वर्गातील इतर मुली तसे करायला शिकल्या असे यावर समितीच्या लोकांचे उत्तर आहे. पण दुसऱ्या खोलीतील पहिलीतील एका मुलीच्या बाबतीतही हा प्रकार घडत होता याचे काय? यावर ती मुलगी तिसरीतील मुलींच्या संपर्कात होती असे स्पष्टीकरण हे लोक करतात, पण मग ही पहिलीतील मुलगी पहिलीतील इतर मुलींच्या संपर्कात तिसरीतील मुलींपेक्षा जास्त वेळ नव्हती काय? मग पहिलीतील मुली हा प्रकार तिच्यापासून का शिकल्या नाहीत? शिवाय कामे चुकविण्यासाठी या मुली हा प्रकार करीत होत्या हे खरे असेल, तर चौथी-पाचवीच्या वर्गातील मुली हा प्रकार करण्यास जास्त सबळ कारण होते. कारण त्या मोठ्या असल्याने त्यांना जास्त व मोठी कामे करावी लागत असली पाहिजेत. मग त्यांनी हा प्रकार का केला नाही?

**अंधश्रद्ध कोण? गावकरी की समितीचे लोक?**

घरकाम चुकविण्यासाठी या मुली डोळ्यात खडे घालून घेत होत्या, या गोष्टीवर स्वतःसमितीच्या लोकांचाच विश्वास नाही. त्यांनी शोधून काढलेले हे एक थातूरमातूर कारण आहे. लोकांच्या डोळ्यात धूळ फेकण्याचा तो प्रयत्न आहे. याला सबळ पुरावा म्हणजे या लोकांनी मुलींच्या पालकांना "तुम्ही घरकाम सांगत असल्यामुळे या मुली डोळ्यात खडे घालून घेतात. तुम्ही ते सांगणे बंद करा म्हणजे हा प्रकारही बंद होईल." असे काही सांगितलेले नाही, हा होय. मात्र त्यांना या मुली मनोविकृतीने पछाडलेल्या असाव्यात असे वाटत असावे असा संशय येतो. कारण दाभोळकरांनी या मुलींना (व त्यांच्या पालकांनाही) स्वतच्या खर्चाने साताऱ्याला नेण्याचे व हा प्रकार पूर्ण बंद करण्याचे आश्वासन दिलेले आहे. साताऱ्यात त्या मुलींवर मानसोपचार (Psychiatric treatment) करण्याचा त्यांचा विचार असावा, पण दाभोळकरांनी हे आश्वासन पाळलेले नसल्याने त्यांच्या मनोविकृतीच्या सिद्धांताचाही फुगा आता फुटला आहे. आणि यात आश्चर्य नाही. कारण एखाद्या मुलीने हा मुलखावेगळा प्रकार केला असता तर ती मनोविकृती आहे असे म्हणता आले असते. येथे तर दहा मुलींच्या बाबतीत हा प्रकार चाललेला आढळून येतो. इतक्या मुली (आणि त्याही एकाच वर्गातल्या) एकदम मनोविकृतीने कशा पछाडल्या जाणे शक्य आहे? मग दाभोळकरांनी हे आश्वासन का दिले? हीच तर यातील गोम आहे. बुडत्याला काडीचा आधार म्हणतात. मुलींच्या डोळ्यातून खडे येण्याचे कारण त्या मुली ते स्वतःडोळ्यात घालून घेतात या त्यांच्या कारणमीमांसेविरुद्ध इतके पुरावे आहेत, की त्या पुराव्यांच्या प्रचंड लाटेखाली बुडून जाणाऱ्या आपल्या या बुद्धिवादी सिद्धांताला वाचवण्यासाठी त्यांना मुलींच्या मनोविकृतीच्या काडीचा आधार घ्यावा लागला, ही यातील गोम आहे ! पण बुडणारा काडीने कधी कुठे वाचला आहे काय? तेव्हा असल्या मुलखावेगळ्या उपपत्तींनी स्वतला व इतरांनाही फसविण्याचे या लोकांनी इतःपर सोडून द्यावे हे बरे. कडेगावचे पालक व ग्रामस्थ तरी त्यांच्या या कारणमीमांसेने फसलेले नाहीत. उलट हे दुसऱ्यांच्या अंधश्रद्धेचे निर्मूलन करायला निघालेले हे लोक स्वतच्च एका प्रचंड अंधश्रद्धेने पछाडले गेले आहेत, हे सत्य आता या प्रसंगाच्या निमित्ताने कडेगावच्या लोकांना कळलेले आहे. येथे एक गमतीची गोष्ट सांगितली पाहिजे. ज्या शाळेत हा प्रकार घडत होता त्या शाळेचे मुख्याध्यापक श्री. दत्तात्रय कुलकर्णी हे मला या प्रकरणाची माहिती सांगत असताना वरचेवर या समितीच्या लोकांचा उल्लेख 'अंधश्रद्धावाले' असा करीत होते अजाणतेपणे का होईना माणसाच्या तोंडून कधीकधी सत्य बाहेर पडते ते असे !

# कडेगावचा प्रकार भानामतीचाच

या मुली मुद्दाम स्वतच्या डोळ्यात खडे घालून घेत नसतील तर त्यांच्या डोळ्यातून कोठून व कसे खडे येत होते, हा प्रश्न आहे. शरीरशास्त्र व वैद्यकशास्त्र याची उपपत्ती देऊ शकत नाही, हे अनेक नेत्रतज्ज्ञांनी व डॉक्टर मंडळींनी मान्य केले आहे. सांगली, मिरज इ. लांबच्या शहरातून मुद्दाम कडेगावला येऊन या प्रकाराची तपासणी करून हा प्रकार खरा असल्याची स्वतची खात्री डॉ. पानसे, डॉ. लागू, डॉ. आयाचित प्रभृतींनी करून घेतली असल्याचा उल्लेख मागे आलाच आहे. गावातील अनेक प्रतिष्ठित नागरिक, पोलिस अधिकारी, शिक्षण अधिकारी यांनीही हा प्रकार खरा असल्याची ग्वाही दिली आहे. अशा रीतीने ज्या घटनेची रूढ विज्ञानाच्या पद्धतीने उपपत्ती देता येत नाही, तरी जी घडते याबद्दल कसल्याही संशयाला जागा राहत नाही, ती घटना अज्ञात अशा शक्तीमुळे घडत असली पाहिजे असे मानावे लागते. याला भ्रम किंवा संमोहनाचा प्रकारही म्हणता येत नाही. कारण त्यासंबंधीचे असंख्य पुरावे (उदा. या प्रकरणातील खडे) तपासण्यासाठी कोणालाही उपलब्ध होऊ शकतात, ते वाटेल तितके दिवस जतन करून ठेवता येतात. अशा अज्ञात शक्तीला आपल्याकडे 'भानामती' हे नाव देण्यात आले असून पाश्चात्य देशात हिला 'पोल्टरगाईस्ट' म्हणतात. अशा घटनांचा परामानसशास्त्रज्ञ अभ्यास करीत असून त्याचे शास्त्रीय नाव 'सायकोकायनेसिस' असे आहे.

कडेगावचा हा प्रकार भानामतीचा असल्याबद्दल त्या मुलींच्या पालकांची, स्वतः ज्या शाळेत हा प्रकार सुरू झाला त्या शाळेच्या मुख्याध्यापकांची, त्या शाळेच्या वर्गशिक्षकांची, गावातील इतर ग्रामस्थांची, गावातील व बाहेरील वैद्यकीय क्षेत्रातील तज्ज्ञ मंडळींची, पोलिस अधिकाऱ्यांची, शिक्षण अधिकाऱ्यांची खात्री झाली असल्याचे आढळून येते. शाळेतील ज्या खोलीत हा प्रकार घडत होता, त्या खोलीच्या छताला मंतरलेला एक नारळ तांबड्या फडक्यात बांधलेला होता, ही गोष्ट याच वस्तुस्थितीची निदर्शक मानता येईल. खुद्द वैद्यकीय तज्ज्ञांनी वैद्यकीय उपचार करण्याऐवजी दैवी उपाय करण्याचा संबंधित पालकांना सल्ला दिला ही वस्तुस्थिती बरीच बोलकी आहे. समितीच्या कार्यकर्त्यांच्या मताशी एकही नागरिक सहमत असल्याचा आढळून आलेला नाही हेही लक्षणीय आहे. घरकाम चुकविण्यासाठी नेहमीचे माहितीतील उपाय सोडून या मुलींनी डोळ्यात खडे घालून घेण्याचा मुलखावेगळा उपाय का अवलंबिला, तोच त्यांना का सुचला, हा प्रश्न तूर्त बाजूला ठेवू असे मी वर म्हटले आहे. पण हा प्रश्न बाजूला ठेवण्यासारखा फालतू नाही. तर तो

केंद्रस्थानाचा प्रश्न आहे. या प्रश्नाचे उत्तर समितीच्या लोकांजवळ नाही. पण भानामतीमध्ये ते सापडते. कारण भानामतीचे आतापर्यंतचे सर्व प्रकार मुलखावेगळेच आहेत ! याला एकही अपवाद नाही ! (भानामतीच्या अशा मुलखावेगळ्या अनेक प्रकरणांची माहिती विज्ञान आणि चमत्कार या ग्रंथात दिली आहे ती वाचकांनी पाहावी.) भानामतीचे अनेक प्रकार असले तरी डोळ्यातून खडे निघण्याचा प्रकार मात्र अपवादात्मकच आढळतो. काही दिवसांपूर्वी "Eyes that produce Stones" या मथळ्याखाली अशाच प्रकारच्या भानामतीची बातमी एका इंग्रजी दैनिकात प्रसिद्ध झाली होती. कडेगावची भानामती १७ फेब्रुवारी १९८८ रोजी सुरू झाली असून त्या दिवशी अमावस्या होती. या गोष्टीकडे कडेगावच्या ग्रामस्थांनी माझे लक्ष वेधले आहे. ही गोष्ट येथे नमूद केली पाहिजे. (कागवाडची भानामतीसुद्धा अमावस्येच्या दिवशीच सुरू झाल्याची मला आढळून आली आहे. (पाहा, उपर्युक्त ग्रंथ प्रकरण १) ही गोष्टही मला येथे नमूद केली पाहिजे. हा योगायोग आहे की याला काही अर्थ आहे याविषयी काहीच सांगता येत नसल्यामुळे तूर्त ही गोष्ट नमूद करून ठेवणे एवढेच आपल्या हाती आहे.")

## गावकरी समितीच्या लोकांवर का रागावले?

शेवटी कडेगावचे ग्रामस्थ व पालक समितीच्या कार्यकर्त्यांवर का रागावले याविषयी थोडे लिहिले पाहिजे. समितीच्या लोकांनी, या मुली डोळ्यात का खडे घालून घेत होत्या हा प्रश्न ग्रामस्थांना बुद्धिवादी दृष्टिकोनातून पटवून देण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा मानला असला, तरी ग्रामस्थांच्या दृष्टीने असा प्रश्नच मुळी उपस्थित होत नव्हता. आपल्या मुली कोणत्या स्वभावाच्या आहेत, त्या आपणाला फसवतील काय, म्हणजे आपणाला फसवून डोळ्यात खडे घालून घेण्यासारखी मुलखावेगळी गोष्ट करतील काय करत असतील तर कशासाठी करतील, त्यासाठी एखादे कारण असेलच तर ते त्या ज्यांच्या सतत संपर्कात व देखरेखीखाली आहेत अशा जन्मदात्या पालकांना ते चांगले माहीत होईल, की या बाहेरच्या समितीच्या उपटसुंभ कार्यकर्त्यांना? हा पालकांचा व ग्रामस्थांचा प्रश्न होता. पण हा प्रश्न समितीचे लोक गौण समजत होते व पालकांना मुली फसवत असल्याचाच ते हेका धरून होते व त्यांना का फसवत होत्या हा प्रश्न महत्त्वाचा मानून त्याचे तितकेच मुलखावेगळे स्पष्टीकरण देत होते. याचा स्वाभाविकच पालकांना व ग्रामस्थांना राग आला. ज्या मुलीच्या डोळ्यातून प्रथम खडे येण्यास सुरुवात झाली त्या तनुजा या मुलीचे आजोबा श्री. सर्जेराव देशमुख हे मराठी

शाळेचे निवृत्त मुख्याध्यापक असून ते म्हणाले, की हे समितीचे लोक स्वतला सर्वज्ञ समजतात, जगातील सर्व रहस्ये आपण उकललेली आहेत, आपणाला कळत नाही असे या जगात काही नाही अशा समजुतीखाली वावरत असलेले दिसतात. त्यांच्या या विधानात उपरोध द चीड मला दिसून आली. आश्चर्य असे की अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या व विज्ञानप्रबोधिनीच्या कार्यकर्त्यांना कडेगावला ज्यांनी मुद्दाम बोलावून घेतले, त्या डॉ. बर्वे यांनासुद्धा समितीच्या लोकांचे भानामती खोटी आहे हे म्हणणे पटलेले नाही. आणि ते का पटलेले नाही हे सांगताना स्वतच्या अनुभवातील त्यांनी प्रत्यक्ष पाहिलेले भानामतीचे दोन किस्सेच मला सुनावले ते ऐकून मला प्रश्न पडला, की त्यांनी हे किस्से समितीच्या लोकांना का सुनावले नाहीत? पण नंतर लक्षात आले की त्यांना ते ऐकवून काही उपयोग नाही हे बर्व्यांनी ओळखले होते! कारण त्यांच्यावरच त्यांनी अंधश्रद्धेचा उलट आरोप केला असता ! आणि मग बर्वे यांना गप्प बसावे लागले असते पण मग अगोदरच गप्प बसलेले काय वाईट? हे बर्वे यांनी बरोबर ओळखले !

* याविषयीची शास्त्रीय चर्चा 'विज्ञान आणि चमत्कार' या ग्रंथाच्या १६ व्या प्रकरणात केली आहे.

कडेगावची भानामती आणि 'अंनिस' ची बुवाबाजी

---